**हज हाऊस नागपूर या इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा बसविण्याच्या कामास प्रशासकीय मंजुरी देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः हज २०१६/प्र.क्र.५१/कार्या-५,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०९/०९/२०२१

वाचा -

१) महाराष्ट्र राज्य हज समिती यांचे पत्र क्र.एमएसएचसी/१२९, दि.०१/०७/२०२१
२) नागपूर महानगर पालिका (विद्युत विभाग), यांचे पत्र क्र.एल.डी./का.अ./ ४३७१, दि.२८/०६/२०२१.
३) मुख्य अभियंता (विद्युत) यांचे पत्र क्र.मु.अ.(वि)/का-३(५)/९१४/ सन २०२१, दि.१०/०७/२०२१.

**प्रस्तावना :**

नागपूर हज हाऊसची इमारत नागपूर सुधार प्रन्यासकडून दि.२९/०९/२०१२ रोजी महाराष्ट्र राज्य हज समितीकडे हस्तांतरीत करण्यात आली. या इमारतीसंबंधात अग्निशमन विभागातर्फे सूचना करण्यात आल्या. याप्रमाणे या इमारतीकरिता असलेल्या अग्निशमन यंत्रणेमध्ये दुरुस्त्या व अद्ययावतीकरण यांची आवश्यकता आहे. त्यानुसार दुरुस्त स्वरुपातील अग्निशमन यंत्रणा उभारणीचे सन २०२०-२१ च्या दरसुचीवर आधारित रु.१,०३,८१,५००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक तयार करण्यात आले.

**शासन निर्णय** :

हज हाऊस नागपूर या इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा बसविण्याकरिता सन २०२०-२१ च्या दरसुचीवर आधारित रु.१,०३,८१,५००/- (रुपये एक कोटी तीन लाख एक्याऐंशी हजार पाचशे फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदरचे काम शासनाच्या विहीत पध्दतीनुसार परवानाधारक व शासनाकडे नोंदणीकृत असलेल्या विद्युत ठेकेदाराकडून करून घेण्यात यावे.
२. कामासाठी वापरण्यात येणारे विद्युत साहित्य आय.एस.आय. मार्कचे असावे.

३. वीजसंच मांडणी उभारणी प्रचलित केंद्रीय विद्युत प्राधिकरण अधिनियम २०१०, प्रचलित मानके, तसेच सा.बां. (विद्युत) विभागाचे विनिर्देशांमधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

४. दरसूचीतील बाबींचे सा. बां. (विद्युत) विभागाकडून प्रसारित करण्यात आलेले विनिर्देश (Specifications) निविदेमध्ये समाविष्ट करणे बंधनकारक आहे.

५. सदर कामासाठी शासनाच्या इतर विभागाकडून आवश्यक प्रमाणपत्रे/ना हरकत इ. पूर्तता करुनच पुढील कार्यवाही करावी.

६. अग्निसूचक व अग्निशमन यंत्रणेकरीता ले-आऊट, एकरेषीय आकृती, तांत्रिक परिगणना इ. तांत्रिक बाबींची पूर्तता करूनच ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

या कामाचा खर्च "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (०१९) हज समितीला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ए२७६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

या कामास मुख्य अभियंता (विद्युत), महाराष्ट्र शासन यांनी तांत्रिक मान्यता दिली आहे.

सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग पाच मधील अ,क्र. १ नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०९१५२२२६६७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fde30534317da1ea9bdb3e7bec3c1084d5d608a86e993f8ac0fa02331b77751, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2021.09.09 15:23:04 +05'30'

**(सं.छ.तडवी)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री/राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभागा, मंत्रालय, मुंबई

८. उप सचिव, वित्त विभाग, व्यय ४/अर्थसं, मंत्रालय, मुंबई
९. उप सचिव, नियोजन विभागा, मंत्रालय, मुंबई
१०.जिल्हाधिकारी, नागपूर
११.आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
१२.महालेखापाल, लेखा परीक्षा, नागपूर
१३.महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता, नागपूर
१४.कोषागार अधिकारी, नागपूर
१५.कार्यकारी अधिकरी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई
१६.निवड नस्ती